शालेय पोषण आहार योजनेंतर्गत अनुसूचित जमाती (TSP) उप योजनेच्या निधी वितरणाबाबत (सन २०२०-२१)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

### शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२०/प्र.क्र.१४६/एस.डी.३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०२०

**वाचा:-**

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०

३) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.४-१/२०१२-Desk (MDM), दि. ०५/१२/२०१९

४) शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. शापोआ-२०१९/प्र.क्र.१००/एस.डी.३, दि. २४/१२/२०१९.

५) शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. शापोआ-२०१९/प्र.क्र.१००/एस.डी.३, दि.०५/०२/२०२०.

६) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२०/प्र.क्र.४/कार्यासन.६, दि. २८/१०/२०२०.

**प्रस्तावना :-**

शालेय पोषण आहार योजनेंतर्गत केंद्र शासनाच्या प्रकल्प मान्यता मंडळाने सन २०१२-१३ व सन २०१३-१४ मध्ये एकूण ८४,९७० शाळांमध्ये स्वयंपाकगृह उपकरणे पुरविण्यासाठी मान्यता दिलेली होती. सदर निधीची केंद्र शासनाने विगतवारी सर्वसाधारण (General Head), अनुसूचित जाती उपयोजना (SCSP), आणि आदिवासी जमाती उपयोजना (TSP)अशी केली आहे.

केंद्र शासनाने प्रस्तुतप्रमाणे विगतवारी केल्याप्रमाणे सर्वसाधारण लेखाशिर्ष तसेच अनुसूचित जाती उपयोजना लेखाशिर्षांतर्गतचा वितरीत केलेला निधी राज्य शासनाने संदर्भाधिन क्र.४ व ५ अन्वये वितरीत केला आहे. तथापि, सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये आदिवासी जमाती उपयोजनेच्या लेखाशिर्षांतर्गत मंजूर निधी प्रशासकीय कारणास्तव वितरित केलेला नव्हता. प्रस्तुत निधी २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरित करण्यात आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन क्र.६ अन्वये मान्यता दिली आहे. तद्नुषंगाने सदर निधीच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

आदिवासी विकास विभागाच्या दि. २८/१०/२०२० च्या शासन निर्णयास अनुसरुन शालेय पोषण आहार योजनेसाठी आदिवासी जमाती उपयोजनेच्या (TSP) लेखाशिर्षाखालील केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून खालीलप्रमाणे रु.१३८५.०७ लक्ष (रुपये तेरा कोटी पंच्याऐंशी लक्ष सात हजार) निधी सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पित तरतूद | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक टी -५ २२०२ -सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, ७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना -केंद्र पुरस्कृत योजना (०१) (०८) शालेय पोषण आहार कार्यक्रम (MDM) (केंद्र पुरस्कृत योजना) (अनुसूचित जमाती उपयोजना) (TSP) (केंद्र हिस्सा ६०%) (२२०२ I५३२) | रु.१२६६९.३९ लक्ष | रु.८८५.०७ लक्ष |
| २. | मागणी क्रमांक टी -५ २२०२ -सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, ७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना -केंद्र पुरस्कृत योजना (०१) (०९) शालेय पोषण आहार कार्यक्रम (MDM) (केंद्र पुरस्कृत योजना) (अनुसूचित जमाती उपयोजना) (TSP) (राज्य हिस्सा ४०%) (२२०२ I५४१) | रु.५०००.०० लक्ष | रु.५००.०० लक्ष |
| **एकूण** | | **रु.१७६६९.३९ लक्ष** | **रु.१३८५.०७ लक्ष** |

२. सदरचा निधी वितरणासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, उपसंचालक (वित्त व लेखा), शालेय पोषण आहार कक्ष, प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. खर्चासंबंधीच्या सद्याच्या शासकीय धोरणास अनुसरून मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

४. निधी वितरित करताना वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.१६/०४/२०२० व शासन निर्णय दि. ०४/०५/२०२० मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

५. सदरचा शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय दि.२८/१०/२०२० रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. २३३/अर्थोपाय, दिनांक २५/०९/२०२० अन्वये दिले आहेत. तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५०९/व्यय-१४, दि. ०८/१०/२०२० अन्वये सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०३१७३५५१५१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=68d5a8abffdd75cba24301aa39c12b40983f304d7267796a32b42d4d558f1a1f, ou=SCHOOL EDUCATION , o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2020.11.05 14:55:29 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३.